सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत पदवीधर/पदविकाधारक बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदांवर नियुक्तीसाठी दिलेल्या सवलतींबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांक:पअंक-१००८/प्र.क्र.७८/०८/१६-अ,**

**सामान्य प्रशासन विभाग,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक:- २९ मे, २०१०.**

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-पअंक-१०९७/ १७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.१९ मार्च,१९९८,
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:संकीर्ण-१००३/प्र.क्र.९६/२००३/१३-अ, दि.१९.११.२००३,
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:एसआरव्ही-२००५/प्र.क्र.४७/०५/२, दि.२५.८.२००५.

**प्रस्तावना:-** वरील संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १९ मार्च, १९९८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (क) नुसार पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदांवरील नियुक्तीसाठी निवड मंडळामार्फत घेतल्या जाणाऱ्या स्पर्धा परीक्षेत त्यांनी अंशकालीन काम केलेल्या प्रत्येक वर्षासाठी २ टक्के अधिक गुण ( परंतु कमाल गुण ५ टक्के च्या वर असणार नाहीत ) देण्याची सवलत मंजूर करण्यात आली आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील ॲप्लिकेशन क्रमांक: ११६४६/ ११७२४ /१९९६ प्रकरणी, शासकीय/निमशासकीय तसेच खाजगी आस्थापनेतील रिक्त पदे भरण्याबाबत रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्राकडून (सेवायोजन कार्यालये ) जेष्ठतेनुसार यादी प्राप्त करुन घेण्यात यावी, त्याचबरोबर सर्व प्रसार माध्यमातून जसे वर्तमान पत्र, दूरदर्शन, रेडिओ, नोटीस बोर्ड व रोजगार पत्र इत्यादींमध्ये जाहिरात प्रसिध्द करुन अर्ज मागविण्यात यावेत, अशा प्रकारे प्राप्त होणाऱ्या सर्व अर्जांचा निवडीसाठी विचार करण्यात यावा, असे निदेश दिले आहेत. त्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक २ पुढे नमूद केलेले शासन परिपत्रक दिनांक १९/११/२००३ निर्गमित केले आहे. तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाने ए.उमरानी विरुध्द रजिस्ट्रार को. ऑप.सोसायटी, तामिळनाडू व इतर या प्रकरणी शासकीय/निमशासकीय सार्वजनिक उपक्रमामध्ये पदे भरताना नियुक्ती विहित मार्गाने करणे शासनावर बंधनकारक आहे असे स्पष्ट करुन विहित कार्यपध्दती व नियमांचे पालन न करता मागील दाराने अनियमितपणे केलेल्या नेमणूका नियमित करण्यात येऊ नयेत, असे निदेश दिले आहेत. त्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक-३ पुढे नमूद केलेले शासन परिपत्रक,दिनांक २५/८/२००५ निर्गमित केले आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाने एका प्रकरणी तेलगू माध्यमातून पदवीधर झालेल्या उमेदवारांना नोकर भरतीमध्ये देण्यात आलेली ५ टक्के अधिक गुणांची सवलत भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद १४, १५ व १६ (१) चे उल्लंघन करणारी असल्याचे स्पष्ट केले आहे हे विधी व न्याय विभागाने दिलेल्या अभिप्रायावरुन निदर्शनास आले आहे. शासन निर्णय, दिनांक १९/३/१९९८ अन्वये पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचाऱ्यांना वरीलप्रमाणे दिलेली अनुग्रह गुणाची (ग्रेस मार्क ) सवलत भारताच्या संविधानातील सदर तरतुदींचे उल्लंघन करणारी आहे. सबब, मा.सर्वोच्च न्यायालयाचे वरील विविध निर्देश/ निर्णय विचारात घेता, अंशकालीन पदवीधर/पदविकाधारक बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" पदांवर नियुक्तीसाठी निवड मंडळामार्फत घेतल्या जाणाऱ्या स्पर्धा परीक्षेत देवू केलेली अनुग्रह गुणांची सवलत पुढे चालू ठेवता येईल अथवा कसे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९७/१६-अ, दिनांक १९ मार्च, १९९८ मधील परिच्छेद २ (क) नुसार सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत पदवीधर/पदविकाधारक

बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" पदांवर नियुक्तीसाठी घेतल्या जाणाऱ्या स्पर्धा परीक्षेत त्यांनी अंशकालीन काम केलेल्या प्रत्येक वर्षासाठी २ टक्के अधिक गुण (कमाल ५ टक्क्यांच्या मर्यादेत ) देण्याची सवलत मंजूर करण्यात आली आहे. सदर सवलत आता याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४२०१४४१५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सु. ना. रणखांबे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय,मुंबई/खंडपीठ औरंगाबाद/नागपूर,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई,
* प्रोथोनेटरी ॲड सिनियर, मास्टर हायकोर्ट, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,/ राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
सर्व मंत्रालयीन विभाग,/ मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
वित्त विभाग,
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
निवड नस्ती/कार्यासन १६-अ
* (पत्राने)

D:\DANGARE\G R ROTA.lwp\68.